**रूपांतरित साठवण तलाव कडबगाव क्र. १ ता. अक्कलकोट जि. सोलापुर या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२३/प्र.क्र-६९५/जल-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक: १६ मार्च, २०२४.**

वाचा:
अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण विभाग, प्रादेशिक क्षेत्र पुणे यांचे पत्र क्र प्रशा-१/५९१५ दि: २०.११.२०२३

**प्रस्तावना**

शासनास सादर झालेल्या अंदाजपत्रकानुसार सदर योजना हि मौजे कडबगाव क्र. १ ता. अक्कलकोट जि. सोलापुर येथे स्थानिक नाल्यावर प्रस्तावित आहे. सदरचा तलाव रोहयो अंतर्गत सन १९७२-७३ ला मंजुर करण्यात आलेला होता. सद्यस्थितीत तलावात पाणी गळती होत असुन सांडव्याचे बरीच पडझड झालेली आहे. त्यामुळे सदर योजनेचे साठवण तलावात रुपांतर करणेची स्थानिक ग्रामस्थ व मा. लोकप्रतिनिधी यांची मागणी आहे. प्रस्तावित साठवण तलाव ४४० मी लांबीचा व ९.६३ मी उंची चा आहे. सदरहू साठवण तलावाची प्रस्तावित पाणी साठवण क्षमता २४० सघमी व सिंचन क्षेत्र ५० हे आहे. त्यास अनुसरुन सदर रुपांतरीत साठवण तलावास प्रशासकीय मान्याता मिळण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भिय पत्रान्वये शासनास सादर करण्यात आलेले होते. याबाबत शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

सोलापूर जिल्ह्यातील रूपांतरित साठवण तलाव कडबगाव क्र. १ ता. अक्कलकोट जि. सोलापुर ह्या कामासाठी लागणारी एकूण किंमत **रु ४,५५,९४,००७/- ( अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष चौऱ्याण्णव हजार सात फक्त)** या किंमतीच्या प्रस्तावास खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. या योजनेच्या मूळ अंदाजपत्रकानुसार उपशिर्षनिहाय तरतूद सोबत "जोडपत्र अ" मध्ये सादर करण्यात येत आहे.

१) पाणी वापर संस्था स्थापन करण्यासाठी ठेकेदारास निविदेत अटी घालून बंधनकारक करण्यात यावे. WUA स्थापन होईपर्यंत निविदेच्या १०% रक्कम ठेकेदाराच्या देयकातून कपात करण्यात यावी. संस्था स्थापन झाल्यानंतर सदरची रक्कम वितरित करण्यात यावी. अपवादात्मक परीस्थितीत संस्था स्थापित होऊ शकत नसल्यास सविस्तर करणमीमांसेसह प्रस्ताव शासनास सादर करून शासनाच्या मान्यते नंतर कपात केलेली १०% निधी वितरित करण्यात यावा. संस्था

स्थापन केल्याबद्दल ठेकदारास शासन निर्णय दि.११-०२-२०२२ मध्ये तरतुद केल्या प्रमाणे मानधन देण्यात यावे.

२) प्रकल्पासाठी अधीक्षक अभियंता/प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी कार्यस्थळी भेट देवून स्थळ व संरेखा निश्चित करुन प्रमाणित करणे आवश्यक आहे.

३) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत करण्यात यावा व नियोजित वेळेत काम पूर्ण करण्यात यावे.

४) सदरचे काम पूर्ण होईपर्यत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

५) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्वाचा अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

६) कामांचे Geotag व वेळेसह व्हिडीओ चित्रीकरण बंधनकारक राहील.

a) काम सुरू करण्यापूर्वी

b) २५% पूर्ण झाल्यानंतर.

c) ५०% काम पूर्ण झाल्यानंतर.

d) ७५% काम पूर्ण झाल्यानंतर.

e) १००% काम पूर्ण झाल्यानंतर.

या कामात पाच टप्प्यात Geotag व्हिडीओ चित्रीकरण करण्यात यावे. प्रत्येक टप्प्याच्या व्हिडिओ चित्रीकरणाचा कालावधी किमान ३ मिनिटाचा आवश्यक राहील. काम सुरू करण्यापूर्वी एका बाजूने चित्रीकरण सुरुवात करून दुसऱ्या टोकापर्यंत संपूर्ण चित्रीकरण करण्यात यावे.

अ) व्हिडीओ चित्रीकरण करताना प्रत्येक वेळेस कामाचे जलसंधारण अधिकारी व कंत्राटदार/ त्यांचा प्रशिक्षित तांत्रिक कर्मचारी यांची उपस्थिती अनिवार्य आहे. किमान दोन वेळेस खुद्द कंत्राटदाराची उपस्थिती आवश्यक आहे.

ब) चित्रीकरणांमध्ये किमान दोन टप्प्यांमध्ये उप अभियंता व एका टप्प्यामध्ये कार्यकारी अभियंता यांची उपस्थिती अनिवार्य आहे.

क) देयके पारित करताना मोजमाप पुस्तिका सोबत चित्रीकरणाचा Pendrive सादर करावा.तसे मोजमाप पुस्तिकेत नमूद करावे.

ड) सदर चित्रीकरणाची प्रत कार्यकारी अभियंता यांनी तपासावी व वरील सूचनांप्रमाणे चित्रीकरण नसल्यास देयक पारित करून होणार नाही.

इ) चित्रीकरणाची किमान १५ सेकंदांची संक्षिप्त प्रत विभागाच्या जिओपोर्टलवर Upload करण्यात यावी.

७) काम पूर्ण झाल्यानंतर कामाची गुणनियंत्रणाच्या दृष्टीने विभागाच्या दक्षता व गुणनियंत्रण पथकाकडून तपासणी करण्यात यावी.

८) वरील प्रमाणे प्रकल्पाचे हस्तांतरण झाल्यानंतरचा देखभाल दुरुस्तीचा खर्च लाभार्थ्यांकडून करण्यात यावा.

९) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नागरी २०११/प्र.क्र.१९२/निधी जल-१ दिनांक ०२ फेब्रुवारी २०१२ अन्वये निर्धारित तरतुदींचे काटेकोर अनुपालन करण्यात यावे

१०) आर्थिक दायित्व निर्माण होईल अशा नवीन घटकांचा शासन मान्यतेशिवाय प्रकल्पात समावेश करण्यात येऊ नये.

११) सदर कामाची अंमलबजावणी करतांना दर्जा व गुणवत्ता उत्कृष्ठ ठेवण्याची जबाबदारी संबंधीत क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

१२) पाणीसाठा करण्याच्या दृष्टीने जिल्हा जलसंधारण अधिकारी व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी यांनी काम पुर्ण झाल्यावर प्रमाणित करणे आवश्यक राहील.

१३) शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/ सिं. व्य. (कामे) दि. ०१.०१.२०१५ मधील मार्गदर्शक सूचना नुसार अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे बंधनकारक आहे.

१४) प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय मंजूर किंमतीच्या मर्यादेत व नियोजनानुसार काम पुर्ण करण्यात यावे.

१५) आवश्यकतेनुसार अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे/संकल्पने, बाह्य दरसूची बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

१६) तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी खालील मुद्द्यांची पुर्तता करण्यात यावी..

i. अंदाजपत्रकात वापरण्यात आलेली पीक रचना जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांच्या कडुन प्रमाणित करुन घ्यावी.

ii. वरिष्ठ भूवैज्ञानिक यांचे मार्फ़त सदर योजनेचे स्थळ योग्य असल्याबाबतचे प्रमाणित करणे आवश्यक आहे .

iii. B.C Ratio अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता यांनी प्रमाणित करणे आवश्यक आहे.

iv. E.अप्पर R.R Calculation आयुक्त तथा मुख्य अभियंता यांनी प्रमाणित करणे आवश्यक आहे.

v. दर्शक नकाशा अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, पुणे यांच्या मार्फ़त प्रमाणित होणे आवश्यक आहे.

२.०. या योजनेच्या कामावर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रं.** ZH-५

**४७०२, लहान पाटबंधारे योजना**

**४७०२ ए ०१९**

००

**१०१, भूपृष्ठ जल,**

**लहान पाटबंधारे**

**(०१) लहान पाटबंधारे योजना,**

**०-१०० हे सिंचन क्षमता (कार्यक्रम),**

**५३ मोठी बांधकामे**

सदरहू योजनेच्या कामास वरील लेखाशिर्षांतर्गत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रस्तुत आदेश,प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३१६१८४००३१५२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAKASH
NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.16 18:49:12 +05'30'

**(प्र. नि. पाटील)**
**कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन,मलबारहिल,मंबई.
२) मा.मुख्यमंत्री,यांचे अप्पर मुख्य सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा,विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
४) सर्व मा.संसद सदस्य,विधान मंडळ सदस्य,महाराष्ट्र राज्य.
५) सर्व मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
६) मा.मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खासगी सचिव
७) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य.
८) सर्व मंत्रालयीन विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधानसचिव/सचिव.
९) मा.मंत्री ( मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
१०) मा.राज्यमंत्री (मृद व जलसंधारण)यांचे खाजगी सचिव.
११) मा.सचिव ( मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक
१२) महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता) (लेखापरिक्षण),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
१३) आयुक्त मृद व जलसंधारण, जल आयुक्तालय, औरंगाबाद.

१४) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, औरंगाबाद.
१५) अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता,मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
१६) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
१७) प्रादेशिक दक्षता  गुणनियंत्रण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
१८) जिल्हा जलसंधारण अधिकारी,मृद व जलसंधारण विभाग, सोलापूर.
१९) कार्यासन अधिकारी (जल-४),जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई.
२०) निवडनस्ती (जल-१).

मृद व जलसंधारण विभाग

जोडपत्र 'अ'

रूपांतरित साठवण तलाव कडबगाव क्र. १ ता. अक्कलकोट जि. सोलापुर या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत गोषवारा.

शासन निर्णय क्रमांक: नप्रमा-२०२३/प्र.क्र-६९५/जल-१ दिनांक १६ मार्च, २०२४.

| अक्र. | उपशीर्ष | रूपांतरित साठवण तलाव कडबगाव क्र. १ तासोलापुर .अक्कलकोट जि . |
|---|---|---|
| 1 | A Preliminary | ५०००.०० |
| 2 | B Land | ०.०० |
| 3 | C Works | |
| | १) Dam Proper | ३,४२,६७,२७५.०० |
| | २) Waste Weir | ४०,५०,५१३.०० |
| | ३) Tail & Approach Channel | ३१,११,३०९.०० |
| 4 | K Building | ०.०० |
| 5 | M Plantation | ०.०० |
| 6 | O Miscellaneous | ५,०००.०० |
| 7 | P Maintenance | ५,०००.०० |
| 8 | R Communication | ५,०००.०० |
| | **Total of all Sub Heads Rs.** | **४,१४,४९,०९७.००** |
| 9 | Add १०% Centage charges (excluding B-Land & Royalty) | ४१,४४,९१०.०० |
| | **Grand Total** | **४,५५,९४,००७.००** |

(अक्षरी रुपये चार कोटी पंचावन्न लक्ष चौऱ्याण्णव हजार सात फक्त)

PRAKASH NILKANTHRAO PATIL

Digitally signed by PRAKASH NILKANTHRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT,
2.5.4.20=a7dc90f966c671a9acd0a599ee5fc497272e775d33643b14725c6a77432c673f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F1EC28A96B2A52575AE4CCCA512D1723F249D503AE71CF458BA4863AACFFBF62, cn=PRAKASH NILKANTHRAO PATIL
Date: 2024.03.16 18:49:32 +05'30'

(प्र. नि. पाटील)

कार्यकारी अभियंता तथा अवर सचिव

महाराष्ट्र शासन